**महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियम १९६६**
**शॉपिंग कॉम्प्लेक्समध्ये पुस्तक विक्रेत्यांसाठी गाळा राखून ठेवणेबाबत.....**
**कलम १५४ (१)अन्वये निदेश....**

महाराष्ट्र शासन
नगर विकास विभाग,
मंत्रालय,मुंबई- ४०० ०३२.
दिनांक: २९ एप्रिल, २००२.

## आदेश

क्र. टीपीबी ४३२०/१४३६/प्र.क्र.६८/२००२/नवि-११

लोकांमध्ये वाचण्याची आवड वाढविण्यासाठी व पुस्तक प्रकाशन उद्योगास चालना देण्यासाठी केंद्र शासनास शिफारस करण्याबाबत केंद्र सरकारने गठित केलेल्या समितीने शिफारस केली आहे की, शॉपिंग कॉम्प्लेक्स जवळच्या मार्केटमध्ये पुस्तक विक्रेत्यांसाठी गाळे आरक्षित करण्याबाबत सर्व राज्यांच्या नगर विकास विभागांना विनंती करण्यात यावी. त्यानुसार सचिव, केंद्र शासन मानव संसाधन विकास मंत्रालय, शिक्षा विभाग, नवी दिल्ली यांनी त्यांचे दि. १३.७.२००० च्या पत्राद्वारे योग्य ती कार्यवाही तात्काळ करण्याची विनंती राज्य शासनास केलेली आहे.

०२. आर्थिक उदारीकरणाच्या काळात खाजगी प्रयत्नातून होणा-या जमीनीच्या विकसनावर समितीने सुचविलेल्या अटी लादणे हे अमान्यकारक ठरेल परंतु मंजूर विकास योजनेमधील "किरकोळ बाजार" व "दुकान केंद्र" यासाठी आरक्षित केलेल्या जमीनी नियोजन प्राधिकरणाने/विशेष नियोजन प्राधिकरणाने विकसित करताना किंवा यथास्थिती सिडको/म्हाडा/एमएमआरडीए/एनआयटी/नवनगर विकास प्राधिकरणामार्फत विकसित केल्या जाणा-या रहिवास संकुलातील दुकान केंद्रामध्ये १ टक्के गाळे पुस्तक विक्रेत्यांसाठी आरक्षित ठेवणे मात्र योग्य होईल असे शासनाचे मत आहे.

3. त्याकरिता महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियम १९६६ चे कलम १५४ (१) अन्वये सर्व नियोजन प्राधिकरणे/सर्व विशेष नियोजन प्राधिकरणे यांना खालीलप्रमाणे निदेश देण्यात येत आहेत.

## निदेश

मंजूर विकास योजनेत "किरकोळ बाजार" व "दुकान केंद्र" यासाठी केलेल्या जमीनी नियोजन प्राधिकरणाने विकसित करताना एकूण गाळ्यांपैकी १% टक्के गाळे पुस्तक विक्रेत्यांसाठी आरक्षित ठेवण्यात यावे तसेच नियोजन प्राधिकरणे/विशेष नियोजन प्राधिकरणाद्वारे गृहनिर्माण योजना राबविताना अशा निवासी संकुलातील दुकन केंद्रामध्ये पण १ टक्के गाळे पुस्तक विक्रेत्यांसाठी आरक्षित ठेवण्यात यावे. अशा दुकांनाचा वापर स्टेशनरी शालेय पाठयपुस्तके व स्वाध्याय पुस्तकांबरोबर अन्य प्रकारच्या चांगल्या पुस्तकांच्या विक्रीसाठी होणे आवश्यक असून त्याबाबतची खबरदारी संबंधित प्राधिकरणांना घ्यावी लागेल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

( प्र.वि.देशमुख )
उप सचिव

प्रति,
१) सर्व महापालिका आयुक्त, महानगरपालिका
२) सर्व मुख्याधिकारी, नगरपरिषद
३) महानगर आयुक्त, एमएमआरडीए,मुंबई-५१
४) मुख्य कार्यकारी अधिकारी, एमआयडीसी,
उद्योग सारथी" अंधेरी (पूर्व),मुंबई-९३
५) मुख्य कार्यकारी अधिकारी, झोपडपट्टी पूनर्वसन प्राधिकरण, मुंबई-५१.
६) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्र विकास प्राधिकरण,मुंबई-५१
७) मुख्य अधिकारी, पिंपरी-चिंचवड नवनगर विकास प्राधिकरण, पिंपरी-पुणे
८) सभापती, नागपूर सुधार प्रन्यास, नागपूर
९) मुख्य व्यवस्थापकीय संचालक, सिडको लि. निर्मल भवन,मुंबई

प्रत माहितीसाठी व योग्य त्या कार्यवाहीसाठी-
१) सचिव, शालेय शिक्षण विभाग,मंत्रालय,मुंबई
२) संचालक शालेय शिक्षण/उच्च व तंत्र शिक्षण विभाग, सेंट्रल बिल्डिंग,पुणे
३) संचालक, नगर रचना,महाराष्ट्र राज्य,पुणे
४) कक्ष अधिकारी (नवि-९,११,१२,१३,३०,२७)
५) निवड नस्ती (नवि-११)
६) निवड नस्ती (कलम १५४)